अर्थसंकल्पिय अनुदान सन २०२३-२४
“ २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य)
(२२१५ १८८१) ” मागणी क्रमांक वाय-२

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र. ९४/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: १२ जुलै, २०२३

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९४/पापु-२३, दिनांक १८.०४.२०२३
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९४/पापु-२३, दिनांक ११.०५.२०२३
४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९४/पापु-२३, दिनांक २२.०६.२०२३

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतनभत्ते खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२३-२४ करिता ३६,सहायक अनुदाने (वेतन) खर्चासाठी एकूण रुपये ६२.०० कोटी इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक २, ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. जिल्हा परिषदांचा एकूण वेतनखर्च विचारात घेऊन संबंधित जिल्हा परिषदांना पुढील वेतननिधी तसेच विहित अटी व शर्तींची पूर्तता करणा-या जिल्हा परिषदांना वेतनेतर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)” या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये दर्शविल्यानुसार रुपये २४,९३,००,०००/- व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये ८८,००,०००/- असे एकूण रुपये २५,८१,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी एक्याऐंशी लाख फक्त ) इतके अनुदान संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांना मंजूर व वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत सन २०२२-२३ चा अखर्चित निधी शासनास जमा करण्याच्या अधीन सदर निधी वितरीत करण्यात येत असून, अखर्चित निधी शासनास जमा केल्याशिवाय निधी कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. वेतनेतर निधी संबंधित जिल्हा परिषदांनी प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, भाडेपट्टी, मोटरवाहन, विद्युत देयके, पेट्रोल/ तेल/वंगण इत्यादी बाबींसाठी आवश्यकतेनुसार वापरावा.

३. या शासन निर्णयामध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

४. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांची राहील.

५. "३६- सहायक अनुदाने (वेतन)" या उद्दिष्टांतर्गत वितरीत करण्यात येत असलेले अनुदान वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार बिनशर्त स्वरुपाचे आहे. तथापि, शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

६. ३१-सहायक अनुदाने(वेतनेतर) या उद्दिष्टांतर्गत वितरीत करण्यात येत असलेले अनुदान “सशर्त” स्वरुपाचे असून वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी.

७. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. वर नमूद लेखाशीर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा वेळोवेळी ताळमेळ घेण्यात यावा.

९. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात व बिम्स प्रणालीवर उपलब्ध निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. वित्त विभागाच्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१२१६०६३२६३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.07.12 17:18:10 +05'30'

( गणेश पवार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व

४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१२. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१३. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१४. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

## विवरणपत्र-अ

### शासन निर्णय क्रमांक बजेट-१४२३/प्र.क्र.९४/पापु-२३, दिनांक १२ जुलै, २०२३ सोबतचे सहपत्र

मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने(स्थानिक क्षेत्र) (०१) (०५) नियमित आस्थापना (२२१५१८८१)"

| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०२३-२४ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारे अनुदान | | | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५१८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेले एकूण अनुदान (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (३+४) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | १०६००००० | ० | १०६००००० | रूपये एक कोटी सहा लाख फक्त |
| २ | पालघर | ४९००००० | ० | ४९००००० | रूपये एकोणपन्नास लाख फक्त |
| ३ | रायगड | ८७००००० | ० | ८७००००० | रूपये सत्त्याऐंशी लाख फक्त |
| ४ | रत्नागिरी | ४२००००० | ० | ४२००००० | रूपये बेचाळीस लाख फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | ६८००००० | ० | ६८००००० | रूपये अडुसष्ठ लाख फक्त |
| ६ | नाशिक | ६५००००० | ० | ६५००००० | रूपये पासष्ठ लाख फक्त |
| ७ | धुळे | ११४००००० | १८००००० | १३२००००० | रूपये एक कोटी बत्तीस लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | ८१००००० | ० | ८१००००० | रूपये एक्याऐंशी लाख फक्त |
| ९ | जळगांव | ३१००००० | ० | ३१००००० | रूपये एकतीस लाख फक्त |
| १० | अहमदनगर | १८७००००० | ० | १८७००००० | रूपये एक कोटी सत्त्याऐंशी लाख फक्त |
| ११ | पुणे | ३६००००० | ० | ३६००००० | रूपये छत्तीस लाख फक्त |
| १२ | सातारा | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| १३ | सांगली | २७००००० | ० | २७००००० | रूपये सत्तावीस लाख फक्त |
| १४ | सोलापूर | १४५००००० | ० | १४५००००० | रूपये एक कोटी पंचेचाळीस लाख फक्त |
| १५ | कोल्हापूर | १२१००००० | १०००००० | १३१००००० | रूपये एक कोटी एकतीस लाख फक्त |
| १६ | औरंगाबाद | ३६००००० | ० | ३६००००० | रूपये छत्तीस लाख फक्त |
| १७ | जालना | १८००००० | ० | १८००००० | रूपये अठरा लाख फक्त |
| १८ | परभणी | २९००००० | ० | २९००००० | रूपये एकोणतीस लाख फक्त |
| १९ | हिंगोली | ८९००००० | ० | ८९००००० | रूपये एकोणनव्वद लाख फक्त |
| २० | बीड | ४७००००० | ० | ४७००००० | रूपये सत्तेचाळीस लाख फक्त |
| २१ | नांदेड | ४०००००० | २०००००० | ६०००००० | रूपये साठ लाख फक्त |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २२ | उस्मानाबाद | ११९००००० | ० | ११९००००० | रूपये एक कोटी अकरा लाख फक्त |
| २३ | लातूर | १५०००००० | ० | १५०००००० | रूपये एक कोटी पन्नास लाख फक्त |
| २४ | बुलढाणा | २८००००० | २०००००० | ४८००००० | रूपये अठ्ठेचाळीस लाख फक्त |
| २५ | अकोला | २१००००० | ० | २१००००० | रूपये एकवीस लाख फक्त |
| २६ | वाशिम | २४००००० | ० | २४००००० | रूपये चोवीस लाख फक्त |
| २७ | अमरावती | १५३००००० | ० | १५३००००० | रूपये एक कोटी त्रेपन्न लाख फक्त |
| २८ | यवतमाळ | ३२००००० | ० | ३२००००० | रूपये बत्तीस लाख फक्त |
| २९ | वर्धा | ८०००००० | ० | ८०००००० | रूपये ऐंशी लाख फक्त |
| ३० | नागपूर | १४५००००० | ० | १४५००००० | रूपये एक कोटी पंचेचाळीस लाख फक्त |
| ३१ | भंडारा | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| ३२ | गोंदिया | ११३००००० | २०००००० | १३३००००० | रूपये एक कोटी तेहत्तीस लाख फक्त |
| ३३ | चंद्रपूर | ६८००००० | ० | ६८००००० | रूपये अडुसष्ठ लाख फक्त |
| ३४ | गडचिरोली | ७५००००० | ० | ७५००००० | रूपये पंच्याहत्तर लाख फक्त |
| एकूण | | २४९३००००० | ८८००००० | २५८१००००० | रूपये पंचवीस कोटी एक्याऐंशी लाख फक्त |

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5F8711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2023.07.12 17:19:06 +05'30'

(गणेश पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन